**केंद्र शासनाच्या पाणलोट विकास कार्यक्रमाकरिता सामाईक मार्गदर्शक सूचना -2008 राज्यस्तरीय नोडल एजंसीवर (SLNA) नामनिर्देशनाद्वारे सदस्य नेमण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सामासु-२००९/प्र.क्र.७/जल-८,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २८ डिसेंबर, २०१०.**

वाचा :-

**१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. सामासू-१००८/प्र.क्र.४१/जल-२०, दि.२१ मे, २००८.**
**२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसधारण विभाग क्रमांक सामासू-१००८/प्र.क्र.६४/जल-२०, दि.१६ जुलै, २००८.**
**३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. सामासू-२००९/प्र.क्र.०७/जल-८, दि.१७ एप्रिल, २००९.**
**४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.सामासू-२००९/प्र.क्र.०७/जल-८, दि.१७ एप्रिल, २००९.**
**५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.सामासू-२००९/प्र.क्र.०७/जल-८, दि.२९ ऑक्टोबर, २००९.**
**६) मुख्य कार्यकारी अधिकारी, वंसुधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा यांचे पत्र क्र. वपाविय/सदस्य नेमणूक/२०१०/१४३, दि.३१ ऑगस्ट, २०१०.**

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने पाणलोट विकास कार्यक्रमाकरीता दिनांक १ एप्रिल, २००८ पासून सामाईक मार्गदर्शक सूचना लागू केल्या आहेत. या मार्गदर्शक सूचनामधील परिच्छेद २५ नुसार महाराष्ट्र राज्याकरीता वर नमूद दिनांक २१ मे, २००८ च्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय नोडल एजन्सी (SLNA) स्थापन करण्यात आली असून या समितीचे नामकरण वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा असे करण्यात आले आहे. या समितीची नोंदणी मा. धर्मादाय आयुक्त यांच्याकडे संस्था नोंदणी अधिनियम १८६० अंतर्गत करण्यात आली आहे. या शिवाय संदर्भाधिन क्रमांक २ वरील दिनांक १६ जुलै, २००८, संदर्भाधिन क्रमांक ३ वरील दिनांक १७ एप्रिल, २००९ आणि संदर्भाधिन क्रमांक ५ वरील दिनांक २९ ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेवर केंद्र शासन, केंद्र शासनाशी संबंधित संस्था, राज्यातील स्वयंसेवी संस्था, प्रशिक्षण संस्था यांची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच वर क्र. ४ येथे नमूद दि. १७ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेची पुनर्रचना करण्यात आली आहे.

२. आता वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेच्या कार्यकारिणीवर महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, व डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला येथील मृद व जलसंधारण हे पद धारण करणाऱ्या विभाग प्रमुखाची व्यवसायिक तज्ञ म्हणून नियुक्ती करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर नियुक्ती ३ वर्षासाठी राहिल. याशिवाय वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेवर सदस्य म्हणून प्रधान सचिव (नियोजन) यांचीही नेमणूक करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१२२८१६१७२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

(स्वाक्षरी) १३/१/१२

**( वि.रा.ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. मंत्री, जलसंधारण, यांचे खाजगी सचिव
मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र राज्यस्तरीय जलसंधारण सल्लागार परिषद.
मा. राज्यमंत्री, जलसंधारण, यांचे खाजगी सचिव
प्रमुख मार्गदर्शक, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती, राळेगण सिध्दी, ता.पारनेर, जि. अहमदनगर.



E:\F.(U.S)\jal-8\2009\C.R\C.R.7-09.lwp

कार्याध्यक्ष, आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती , शिवाजीनगर, पुणे.

मा. मुख्य सचिव यांचे सचिव

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,

ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,

संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,

महासंचालक, कै.वसंतराव नाईक स्वावलंबन मिशन

संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे

प्रधान मुख्य वन सरंक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर,

वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेचे सर्व सदस्य,

विभागीय कृषि सहसंचालक, ठाणे, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, लातूर.

महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,

महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,

नियोजन विभाग / कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

सर्व कार्यासने/अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती- जल-८